**उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत १० उपजिल्हा रुग्णालयातील ४५० अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- उपजि २३१०/५८/प्र.क्र. ४०/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**<u>शासन निर्णय :</u>**

उपरोक्त शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील ५० खाटांच्या आर्वी, तिरोडा, कामठी, रामटेक, वरोरा, मूल, साकोली, कुरखेडा, अहेरी, आरमोरी या १० उपजिल्हा रुग्णालयातील ४५० अस्थाई पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत चालू ठेवण्यात आली होती. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** आर्वी, तिरोडा, कामठी, रामटेक, वरोरा, मूल, साकोली, कुरखेडा, अहेरी, आरमोरी या १० उपजिल्हा रुग्णालयातील ४५० अस्थाई पदे दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यंत पूढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक - आर - १</u>**

१) " २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३- ग्रामीण आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-१- इतर रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१)- कुटीर रुग्णालये ( २२१० ०३१५)"

२) " २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य.
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन
(०१)(०८) - प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)"

३) "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन
(०१)(०९) - महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पाअंतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयांचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२१० ४६२४)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१९१०२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुहास रा. चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति :- संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (निविमु/वैद्यकीय) मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर
जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, वर्धा / गोंदिया /नागपूर /चंद्रपूर /भंडारा/ गडचिरोली
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा / गोंदिया /नागपूर /चंद्रपूर /भंडारा/ गडचिरोली
वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालये ( उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर यांचेमार्फत)
वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (आरोग्य-३)